**महाराष्ट्रातील बांबू क्षेत्राचे सशक्तीकरण करण्यासाठी "बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र"** (Bamboo Promotion Foundation, Maharashtra) **या कंपनीचे संस्थापक सदस्य यांचे नियुक्ती बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बांबूसा-२०१७/प्र.क्र.६८/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ ऑक्टोबर, २०१८

वाचा:- शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक बांबूसा-२०१७/प्र.क्र.६८/फ-९, दिनांक २४.०८.२०१८

**शासन निर्णय :-**

राज्यातील बांबू क्षेत्राचे सशक्तीकरण करण्यासाठी महाराष्ट्र शासन आणि टाटा ट्रस्ट यांच्या भागिदारीने नफा पायाभूत नसलेल्या कंपनीची म्हणजे **"बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र"** (Bamboo Promotion Foundation,Maharashtra) या कंपनीची स्थापना करण्यास उपरोक्त संदर्भीय शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

कंपनीचे व्यवस्थापन, संचालक मंडळाद्वारे करावयाचे असून मंडळावर प्रत्येक सदस्याद्वारे एक नामनिर्देशित संचालक असेल. महाराष्ट्र शासनाची कंपनीचे संस्थापक सदस्य म्हणून भूमिका लक्षात घेवून व भविष्यात विविध प्रकल्पासाठी देण्यात येणारी अपेक्षीत सहाय्याचा विचार करता मंडळामध्ये महाराष्ट्र शासनाचा एक अतिरिक्त संचालक राहील, म्हणजेच शासनाचे दोन संचालक राहतील. तसेच कंपनीचा पहिला अध्यक्ष हा राज्य शासनाचा प्रतिनिधी असेल, त्यांचा कालावधी दोन वर्षांचा असेल, नंतर अध्यक्ष हे परिभ्रमण (rotation) पध्दतीनुसार सदस्यांमधून निवडले जातील अशी तरतूद करण्यात आली आहे. या तरतूदीस अनुसरुन **"बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र"** (Bamboo Promotion Foundation, Maharashtra) या कंपनीकरीता खालीलप्रमाणे पहिले संस्थापक अध्यक्ष व संस्थापक सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे :

| | | |
|---|---|---|
| १) | **श्री. विकास खारगे, सचिव (वने), महसूल व वन विभाग** | **संस्थापक सदस्य आणि कंपनीचे पहिले अध्यक्ष** |
| २) | **श्री.टी.एस.के. रेड्डी, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर** | **संस्थापक सदस्य** |
| ३) | **श्री.आशिष डब्ल्यू. देशपांडे, सचिव व मुख्य आर्थिक अधिकारी, टाटा ट्रस्ट, मुंबई** | **संस्थापक सदस्य** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१५१७५१३८३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.10.15 17:57:53 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, आदिवासी विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महासंचालक, माहिती व प्रसिध्दी, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण),महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम.लिमिटेड, नागपूर.
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर
१७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१८. व्यवस्थापकीय संचालक, एम.एस.एस.आय.डी.सी. मुंबई.
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र खादी व्हिलेज इंडस्ट्रीज कॉरपोरेशन
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र हस्त शिल्प व हस्तमाग शिल्प महामंडळ
२१. टाटा ट्रस्ट, वर्ल्डट्रेड सेंटर, कफ परेड,मुंबई-४०० ००५.
२२. श्री.विकास खारगे, सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. श्री.टी.एस.के.रेड्डी, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर

२४. श्री.आशिष डब्ल्यू. देशपांडे, सचिव व मुख्य आर्थिक अधिकारी, टाटा ट्रस्ट, मुंबई
२५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षण, लेखावअनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२६. वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
२७. नियोजनविभाग (कार्यासन-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
२८. निवड नस्ती, फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.